**अपर आयुक्त व विशेष निबंधक / पणन संचालक , अपर निबंधक,सहकारी संस्था, गट-अ व सहनिबंधक, सहकारी संस्था, गट-अ या संवर्गाची दि.१/१/२०१९ रोजीची सेवाज्येष्ठता सूची प्रसिध्द करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्रमांकः राजस २०१९/प्र.क्र.१६७/५-स**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीख: १९ नोव्हेंबर, २०१९

**वाचा :**

समक्रमांकाचे शासन परिपत्रक दि.२३/७/२०१९

**शुध्दीपत्रक :**

संदर्भाधीन दि.२३/७/२०१९ च्या शासन परिपत्रकातील

शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग दि.२१/१०/२०११ नुसार सेवाजेष्ठता याद्या तयार करण्याबाबत सूचना देण्यात आलेल्या आहेत. त्यामध्ये दि.१ जानेवारी रोजीची प्रत्येक संवर्गाची स्वतंत्र जेष्ठता यादी प्रसिध्द करण्याच्या सूचना आहेत. तसेच सदर शासन निर्णयातील परिच्छेद ३ (३) (क) मधील तरतुदीनुसार दि.१/१/२०११ रोजीपर्यंतच्या सेवाजेष्ठता याद्या अंतिम झाल्या नसतील तर दि.१/१/२०११ पर्यंतच्या एकत्रित सेवाजेष्ठता यादीस विशेष बाब म्हणून सूट देण्यात आलेली आहे. सदर शासन निर्णयातील तरतूद विचारात घेवून तसेच उपरोक्त संदर्भाधीन क्र.२ येथील दि.१२/०४/२०१८ च्या परिपत्रकानुसार प्रशासन कक्षाकडील अपर आयुक्त व विशेष निबंधक/पणन संचालक व अपर निबंधक, सहकारी संस्था गट-अ तर संदर्भाधीन क्र.३ येथील दि.१७/११/२०१८ परिपत्रकानुसार सह निबंधक, सहकारी संस्था व उप निबंधक, सहकारी संस्था,गट-अ या संवर्गातील दि.१/१/२०१८ च्या अंतिम जेष्ठता याद्या शासन स्तरावरुन प्रसिध्द करण्यात आल्या आहेत.

आता सहकार विभागाच्या प्रशासन कक्षाकडील अपर आयुक्त व विशेष निबंधक/पणन संचालक व अपर निबंधक, सहकारी संस्था, गट-अ व सहनिबंधक, सहकारी संस्था, गट-अ या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या दि.०१/०१/२०१९ च्या सेवाजेष्ठता याद्या सोबत जोडलेल्या अनुक्रमे परिशिष्ट "अ" , "ब " व "क " नुसार अंतिम करण्यात येत आहेत.

**या ऐवजी पुढील प्रमाणे वाचण्यात यावे**

पदोन्नतीचे आरक्षण रदद करण्याबाबत मा.उच्च न्यायालयात दाखल केलेल्या याचिका क्र.२७९७/२०१५ वर दि.४/८/२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने,मा सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ वरील निर्णय प्रलंबीत असून,पदोन्नती देण्यासंदर्भात मार्गदर्शनपर सूचना सामान्य प्रशासन विभागाने दि.२९.१२.२०१७ च्या शासन पत्रान्वये प्रसारित केल्या आहेत.त्यानुसार पदोन्नतीच्या कोटयातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात सेवाज्येष्ठतेनुसार मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अधिन राहून भरण्यात यावीत असे नमूद केले आहे.

अपर आयुक्त व विशेष निबंधक/पणन संचालक व अपर निबंधक, सहकारी संस्था, गट-अ व सहनिबंधक, सहकारी संस्था, गट-अ या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या दि.०१/०१/२०१९ च्या सेवाजेष्ठता याद्या सोबत जोडलेल्या अनुक्रमे परिशिष्ट "अ" , "ब " व "क " नुसार अंतरिम स्वरूपात प्रसिध्द करण्यात येत आहे. सदर संवर्गात तदर्थ पदोन्नतीने कार्यरत अधिका-यांची यादी अनुक्रमे परिशिष्ट "ब" नुसार आहे.

सदर ज्येष्ठतासूची मा.उच्च न्यायालय,मुंबई येथे दाखल केलेल्या रिट याचिका क्र.२७९७/२०१५ तसेच संलग्न व इतर न्यायालयीन प्रकरणामध्ये झालेल्या अंतिम निर्णयाच्या विरुध्द मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल करण्यात आलेल्या विशेष अनुमती याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या निर्णयाच्या अधीन राहून प्रसिध्द करण्यात येत आहे.मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयानंतर अंतिम ज्येष्ठता सूची निर्गमित करण्यात येईल.

सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेताक २०१९११२०१५३६१५७२०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manjiri Ganeshbhushan Joshi

Digitally signed by Manjiri Ganeshbhushan Joshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Operation Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=91b4708db2a52d675f7f30d81444f3844833dfc7c86d4244ee1075c97c713180, serialNumber=7d5731d128ab41d6a090557a2e9658b7382ac03af6e239ba66cc1cf9a6cf2f52, cn=Manjiri Ganeshbhushan Joshi
Date: 2019.11.20 15:38:08 +05'30'

**(मं.ग.जोशी)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन,

**प्रत,**

१. सहकार आयुक्त व निबंधक,पुणे ,महाराष्ट्र राज्य ,सहकारी संस्था ,
२. साखर आयुक्तमहाराष्ट्र , राज्य,पुणे ,
३. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
४. संचालक, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर,
५. सर्व संबंधित अधिकारी, द्वारा सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
६. सामान्य प्रशासन विभाग (१२), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
७. निवड नस्ती.